“लोणार सरोवर विकास आराखडयाअंतर्गत” पाणी पुरवठा योजना या कामाकरीता सन २०२३-२४ मधील निधी वितरणाबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-तीक्षेवि- २०२४/प्र.क्र.११/का.१४४४-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १५ मार्च, २०२४.

**वाचा :** १) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२२/प्र.क्र.८४/फ-९, दि. २७.०७.२०२२

२) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.तीक्षेवि-२०२३/प्र.क्र.५९/का.१४४४-अ, दि.२३.०५.२०२३

३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.०५.०२.२०२४.

४) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.तीक्षेवि-२०२४/प्र.क्र.११/का.१४४४-अ, दि.१५.०२.२०२४

५) विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, अमरावती यांचे दि.२६.०२.२०२४ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :**

लोणार सरोवर विकास आराखडयाअंतर्गत विविध कामांकरीता सन २०२३-२४ करीता रु.४०.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित केला आहे. तसेच सुधारीत अंदाजानुसार रु.३२.०० कोटी इतकी तरतूद करण्यात आली आहे. वाचा क्र.२ येथील शासन निर्णयान्वये लोणार सरोवर विकास आराखडा अंतर्गत प्रशासकीय मान्यताप्राप्त कामांसाठी विभागीय आयुक्त, अमरावती यांना सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता रु.१०.०० कोटी इतका निधी वितरीत केला आहे. तसेच वाचा क्र.४ येथील शासन निर्णयान्वये लोणार सरोवर विकास आराखडा अंतर्गत भूमीगत गटार योजना या कामासाठी विभागीय आयुक्त, अमरावती यांना सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता रु.१०.०० कोटी इतका निधी वितरीत केला आहे. आता वाचा क्र.५ अन्वये लोणार सरोवर विकास आराखडयाअंतर्गत “पाणीपुरवठा योजना” या कामाकरीता रुपये १०.०० कोटी इतका निधी विभागीय आयुक्त, अमरावती यांना उपलब्ध करुन देण्याची विनंती केली आहे.

लेखाशिर्ष ५४५२ ०१८७ - ५३ मोठी बांधकामे अंतर्गत रु.१०.०० कोटी इतका निधी वित्त विभागाने वितरीत केला आहे. सबब लोणार सरोवर विकास आराखडयाअंतर्गत “पाणीपुरवठा योजना” या कामाकरीता रु.१०.०० कोटी इतका निधी विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती यांना उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :</u>**

लोणार सरोवर विकास आराखडयाअंतर्गत “पाणीपुरवठा योजना” या कामाकरीता सन २०२३-२४ करीता रु.१०.०० कोटी इतका निधी (रुपये दहा कोटी फक्त) विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, अमरावती यांना वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

(रु.कोटी)

| अ.क्र. | लेखाशीर्ष व उद्दीष्ट | सन २०२३-२४ करीता अर्थसंकल्पित निधी | यापूर्वी वितरीत निधी | सुधारीत अंदाजाची तरतूद | वित्त विभागाकडून मंजुर झाल्यानुसार प्रस्तावित वितरण |
|---|---|---|---|---|---|
| १. | ५४५२ ०१८७ ५३-मोठी बांधकामे | ४०.०० | २०.०० | ३२.०० | १०.०० |

२. सदरहू खर्च “लेखाशिर्ष मागणी क्र. ओ-१०, मुख्य लेखाशिर्ष ५४५२- पर्यटनावरील भांडवली खर्च ,०१, पर्यटनासाठी पायाभूत सुविधा,१०१-पर्यटन केंद्रे (००) (१२) लोणार सरोवर विकास आराखडा (कार्यक्रम) (५४५२ ०१८७) ५३-मोठी बांधकामे” या उद्दिष्टाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. सदर प्रयोजनासाठी झालेला प्रत्यक्ष खर्च व प्रधान महालेखापाल, मुंबई यांचे कार्यालयाने नोंदविलेला खर्च याचा ताळमेळ घालण्याची कार्यवाही विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती यांनी करावी. तसेच वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती यांनी शासनास तात्काळ सादर करावे.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.१९२/२०२४/व्यय-८, दिनांक १२.०३.२०२४ अन्वये प्रदान केलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१८१०४४४६३२१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MILIND RAGHUNATH KULKARNI

Digitally signed by MILIND RAGHUNATH KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, 2.5.4.20=438fa70bb728385b5c81bde24450c11d5ce0d99ed18a61fb5b1685722e2c2c03, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DB6FB8A1DB6A8793024B0C8728EB79AB35DD0CAE14DDA9621D73EA4347C7856A, cn=MILIND RAGHUNATH KULKARNI
Date: 2024.03.18 10:54:20 +05'30'

**( मिलिंद कुळकर्णी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त,अमरावती विभाग, अमरावती.
२) जिल्हाधिकारी, बुलढाणा.

**प्रत,**

३) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
४) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
५) प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) प्रधान सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, नवी मुंबई.
८) नगर विकास विभाग (का. नवि-१६), मंत्रालय, मुंबई.
९) महसूल व वन विभाग (का. फ-९), मंत्रालय, मुंबई.
१०) राज्य अभियान संचालक, महाराष्ट्र नागरी विकास अभियान संचालनालय, मुंबई.
११) मुख्य अधिकारी, लोणार नगर परिषद, जि.बुलढाणा.
१२) जिल्हा नियोजन अधिकारी, बुलढाणा.
१३) जिल्हा कोषागार अधिकारी, बुलढाणा.
१४) का.१४२४, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) कार्यासन (व्यय-८,अर्थ-१६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) निवड नस्ती (का.१४४४-अ), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.